**राजीनामा नामंजूर करुन शासन सेवेत पुनश्च नव्याने रुजू करुन घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः मवैअ- २०१८/प्र.क्र.२०२/सेवा-३**
१० वा मजला, संकुल इमारत, गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : २५ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२.१२.२०१७

**शासन आदेश :-**

डॉ. अमोल भिमराव दवणे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, ग्रामीण रुग्णालय मोताळा जि. बुलढाणा यांनी दि.०१/११/२०१७ च्या अर्जान्वये राजीनामा दिला आहे. डॉ. दवणे यांनी त्यांच्या दि.११.१२.२०१७ रोजीच्या विनंती अर्जान्वये शासन सेवेत परत रुजू होण्याची इच्छा असल्याने त्यांनी दि.०१.११.२०१७ रोजी दिलेला राजीनामा नामंजूर करण्याबाबत विनंती केली आहे. त्यासअनुसरुन डॉ. दवणे यांनी दि.०१.११.२०१७ च्या अर्जान्वये दिलेला राजीनामा संदर्भाधिन शासन निर्णयातील अ.क्र. २ (ड) (२) येथील तरतुदीस अनुसरुन नामंजूर करुन खालील विहीत अटी व शर्तीच्या अधीन राहून त्यांना वैद्यकीय अधिकारी, गट अ या पदावर पुनश्च नव्याने रुजू करुन घेण्यात येत असून, त्यांची पदस्थापना प्राथमिक आरोग्य केंद्र, जळगाव जामोद, जि. बुलढाणा येथे करण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती</u> :-**

(१) डॉ. दवणे वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांचा गैरहजेरीच्या दिनांकापासून ते प्रत्यक्षात रुजू होण्यापर्यंतचा कालावधी सर्व सेवा प्रयोजनार्थ सेवेतील खंड समजण्यात येवून त्यांना रुजू करुन घेण्यात यावे. तसेच त्यांचा गैरहजेरीचा संपूर्ण कालावधी सर्व सेवा प्रयोजनार्थ सेवेतील खंड म्हणून समजण्यात यावा व त्याप्रमाणे त्यांच्या रुजू आदेशात तसे स्पष्टपणे नमूद करावे.

(२) डॉ. दवणे, वैद्यकीय धिकारी यांना रुजू करुन घेण्यापूर्वी त्यांची वैद्यकीय मंडळाकडून वैद्यकीय तपासणी करुन ते सेवा करण्यास शारीरिक / मानसिकदृष्ट्या सक्षम असल्याबाबत वैद्यकीय मंडळाचे प्रमाणपत्र घ्यावे.

(३) संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांचा चारित्र्य व वर्तणूक अहवाल (पोलीस तपास अहवाल) घ्यावा. (फौजदारी स्वरुपाचा / तसेच लाचलुचपत प्रतिबंधक कायद्यांतर्गत कोणत्याही स्वरुपाची तक्रार प्रलंबित नसल्याचा पोलीस अहवाल घ्यावा.)

(४) अ.क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार गैरहजेरीपूर्वीची कोणतीही नियमित / अस्थायी सेवा गैरहजेरीनंतर रुजू करुन घेतल्यानंतरच्या सेवेत जोडून दिली जाणार नाही किंबहुना सेवा सलग करुन मिळणार नाही. तसेच त्यांचा गैरहजेरीचा कालावधी सेवेतील खंड समजण्यात येत असल्याने संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांचा गैरहजेरीचा कालावधी हा कुठल्याही सेवाप्रयोजनासाठी ग्राह्य धरला जाणार नाही. तसेच भविष्यात या विषयाच्या अनुषंगाने न्यायालयात दाद मागणार नाही.

(५) डॉ. दवणे यांनी गैरहजेरीच्या कालावधीत संबंधीत वैद्यकीय अधिकारी कोणताही खाजगी व्यवसाय / नोकरी किंवा परदेश दौरा केला नसल्याबाबत शपथपत्र शासन माहितीसाठी उपसंचालक, आरोग्य सेवा अकोला मंडळ अकोला यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

(६) डॉ. दवणे यांना दि. ३१/१०/२००५ च्या शासन निर्णयानुसार सुरु केलेली अंशदायी निवृत्तीवेतन योजना जी सद्यस्थितीत NPS योजनेत समाविष्ट झालेली आहे, ती लागु राहील.

(७) तसेच, भविष्य निर्वाह निधी इ. लाभ देखील मिळणार नाहीत.

(८) डॉ. दवणे यांनी पदस्थापनेचे सदर आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. अन्यथा, सदर पदस्थापनेचे आदेश १५ दिवसानंतर आपोआपच रद्द होतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२३१७४५०५४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Hanmantrao Bhosale

Digitally signed by Satish Hanmantrao Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4c0ff0607bc973d9663171bd9b8a9b9ab8cb569b155f9653d1180a4549819299, cn=Satish Hanmantrao Bhosale
Date: 2018.10.24 22:18:06 -07'00'

**( स. ह. भोसले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) सहसंचालक (अ. व प्र.) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा अकोला मंडळ अकोला.
५) जिल्हा शल्यचिकित्सक जिल्हा रुग्णालय, बुलढाणा.
६) जिल्हा आरोग्य अधिकारी, बुलढाणा.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपुर
८) जिल्हा कोषागार अधिकारी बुलढाणा.
९) डॉ. अमोल भिमराव दवणे, वैद्यकीय अधिकारी (उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ अकोला यांचेमार्फत)
१०) निवड नस्ती सेवा-३.